**पुणे जिल्हा परिषद, आरोग्य विभागाच्या मुख्यालयातील अपघातग्रस्त वाहन क्र.एमएच १२ आर आर १०२० च्या दुरुस्तीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाहन-२०१८/ प्र.क्र.२०४/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, संकूल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
**तारीख : ७ जानेवारी, २०१९.**

वाचा :-

**सहसंचालक, आरोग्य सेवा (प्रा.आ.केंद्रे/उपकेंद्रे/दवाखाने), मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-७अ/टे-८/वाहन दुरुस्ती/३०३८-४०/२०१८, दि.१८.०६.२०१८.**

प्रस्तावना :-

पुणे जिल्हा परिषद, आरोग्य विभागाच्या मुख्यालयातील दि.१२.०२.२०१८ रोजी अपघातग्रस्त झालेल्या वाहनाच्या दुरुस्तीसाठी येणाऱ्या अंदाजित खर्चास मान्यता देण्याबाबतचा आरोग्य सेवा संचालनालयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

शासन निर्णय :-

पुणे जिल्हा परिषद, आरोग्य विभागाच्या मुख्यालयातील क्र.एचएच १२ आर आर १०२० या अपघातग्रस्त वाहनाच्या दुरुस्तीसाठी रु.१,३२,०००/- इतक्या रक्कमेच्या खर्चास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) वाहनाचा वापर आरोग्य संचालनालयाने किंवा राज्य आरोग्य परिवहन संघटनेच्या सक्षम अधिकाऱ्यांनी प्रमाणित केलेल्या अधिकार व कार्यक्षेत्रामध्येच करणे आवश्यक आहे.

२) वाहनाचा वापर ज्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांला वाहन पुरविलेले आहे अशाच अधिकाऱ्याने करावयाचे बंधनकारक आहे. तसेच, ते ज्या क्षेत्राला दिलेले आहे त्याखेरीज इतरत्र त्याचा वापर झालेला नसावा.

३) जिल्हा परिषदांच्या नियंत्रणाखाली असणाऱ्या वाहन पुरविण्यात आलेल्या संस्था किंवा जिल्हा परिषदांकडून अनुदानित असलेल्या वाहन पुरविण्यात आलेल्या संस्थांचे बाबतीत वाहनाच्या अपघात, चोरी, इत्यादी प्रकरणात त्रयस्थ पक्षाने केलेल्या कायदेशीर न्याय मागण्यांची जोखीम व दायित्व अदा करण्याची जबाबदारी वाहन ज्या संस्थेला पुरविलेले आहे त्या संस्थेची आणि

त्या संस्थेच्या प्रमुख कार्यालय / विभागाची राहील. महाराष्ट्र शासनाच्या वतीने आरोग्य खाते अशा बाबतीतील कोणत्याही प्रकारचे दायित्व अदा करणार नाही.

४) आरोग्य खात्याने गुंतविलेल्या भांडवलाचे (वाहनाचे) आग, पूर, भूकंप, अपघात, चोरी, जाळपोळ, सामाजिक दंगेधोपे, नैसर्गिक अथवा मानवी आपत्ती इत्यादी पासून सदैव रक्षण करण्याची जबाबदारी वाहन धारकावर राहील. जर या कारणामुळे वाहनाचे नुकसान झाल्यास त्यावेळी असणाऱ्या वाहनाचे मूल्यातून घसारा मूल्य वजा जाता जे मूल्य असेल तितके मूल्य आरोग्य खात्याला अदा करण्यास वाहन धारक (जिल्हा परिषद / जिल्हा परिषद अनुदानित संस्थां व त्यांची संबंधित प्रमुख कार्यालये / विभाग) बांधील राहील.

५) वरील बाब क्रमांक ४ मध्ये उल्लेख केलेल्या कारणांमुळे वाहनाची नुकसान झाल्यास आरोग्य संचालनालय / राज्य आरोग्य परिवहन संघटना ठरवितील त्या प्रमाणात नुकसान भरपाई देणे त्या संस्थांना बंधनकारक राहील.

६) आरोग्य सेवा संचालनालय / राज्य आरोग्य परिवहन संघटना यांच्या पूर्व लेखी परवानगी शिवाय वाहन धारकाने आपले वाहन आरोग्य सेवेव्यतिरिक्त इतर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीकरीता वापरु नये. अपवादात्मक परिस्थितीत उदा. निवडणुका, आणीबाणीची परिस्थिती, अशा वेळी जिल्हाधिकारी यांच्या हुकमानुसार अन्य प्रयोजनाकरिता वाहन वापरण्यास देण्यास हरकत नाही. मात्र अशा वेळी आरोग्य संचालनालय किंवा राज्य आरोग्य परिवहन संघटना यांची परवानगी घेणे आवश्यक आहे.

७) वाहनाचा अपघात झाल्यास वाहन चालकांनी त्याची माहिती संबंधित पोलीस स्टेशनच्या पोलीस निरिक्षकास देऊन त्याबाबतचा पंचनामा करणे बंधनकारक आहे.

८) वाहनाच्या दुरुस्तीचा तपशील व त्यावर झालेल्या खर्चाची नोंद तसेच, वाहनास बसविलेले टायर, टयुब, बॅटरी इत्यादीचा तपशील वेळोवेळी वाहनाच्या हिस्ट्री पुस्तकात लिहिणे आवश्यक आहे.

९) वरील सूचनांचे कोटेकोरपणे पालन सर्व संबंधितांनी करावे, अन्यथा संबंधितांवर जबाबदारी निश्चित करुन त्यांच्या विरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

१०) याकरीता होणारा खर्च विहित पध्दतीने करण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक-विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, अन्वये, वित्तिय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.१९, नियम क्र. ६९ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२३११५३७३७८४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2019.01.07 16:20:31 +05'30'

**(प्र. मो. बलकवडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, (लेखा व लेखापरिक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), मुंबई/ पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (प्रा.आ.केंद्रे/उपकेंद्रे/दवाखाने), मुंबई.
६. सहाय्यक संचालक (लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
१०. कार्यासन अधिकारी ( अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).